ताजबाग विकास योजना-
निधी वितरणाबाबत .

**महाराष्ट्र शासन**

नियोजन विभाग

**शासन निर्णय क्रमांकः ताविआ २०१४/प्र.क्र.२/का.१४४३**

मादाम कामा मार्ग, हूतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,

दिनांक : १०.११.२०१४.

**वाचा** : १.शासन निर्णय क्रमांकः ताविआ-२०१३/प्र.क्र.१६/का.१४४३, दि.३०.९.२०१३.

२.विभागीय आयुक्त, नागपूर विभाग,नागपूर यांचे पत्र क्र.विनिप/सांस/ताविआ/ २०१४/१२००,दि.२२.८.२०१४.

**<u>प्रस्तावना</u>**

नागपूर शहरातील हजरतबाबा ताजुद्दिन यांचा ताजबाग येथील दर्गा, देश विदेशातील भाविकांचे श्रध्दास्थान असल्याने त्या जागेचे महत्व लक्षात घेऊन या परिसराचा विकास करण्यासाठी ताजबाग विकास आराखडा तयार करण्याच्या कामांसाठी दि.३०.९.२०१३ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेल्या कामांसाठी विभागीय आयुक्त,नागपूर विभाग, नागपूर यांच्या दि.२२ ऑगस्ट,२०१४ रोजीच्या पत्रान्वये मागणी केल्यानुसार सन २०१४-१५ या वित्तीय वर्षासाठी निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय

नागपूर शहरातील हजरतबाबा ताजुद्दिन यांचा ताजबाग येथील दर्ग्याच्या परिसराचा विकास करण्यासाठी ताजबाग विकास आराखडा तयार करण्यात आला असून सन २०१४-१५ या आर्थिक वर्षासाठी रु.२०००.०० लक्ष इतका निधी मार्च,२०१४ च्या अर्थसंकल्पिय अधिवेशनात अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे. त्यामधून विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर यांना ऑगस्ट-२०१४ ते नोव्हेंबर-२०१४ या चार महिन्याकरिता दरमहा रु.३००.०० लक्ष प्रमाणे रु.११४०.०० लक्ष निधी वितरीत करण्यात येत आहे. दि.३०.९.२०१३ मधील अटींची पूर्तता करुन वितरीत केलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास तत्काळ सादर करावे. तसेच शासन परिपत्रक दि.१.७.२०१४ मधील तरतूदीस अनुसरुन ६०% च्या मर्यादेत म्हणजेच रु.११४०.०० लक्ष निधीची विभागीय आयुक्त,नागपूर विभाग,नागपूर यांनी मागणी केल्यानुसार उद्दिष्टनिहाय वाटप खालीलप्रमाणे करण्यात येत आहे.

| उद्दिष्टनिहाय बाबी | रुपये (लाखात) |
|---|---|
| २७, लहान बांधकामे | ६०.०० |
| २८, व्यवसायिक सेवा | १८०.०० |
| ५३, मोठी बांधकामे | ९००.०० |
| एकूण : | ११४०.०० |

२. सदरहू खर्च लेखाशिर्ष "मागणी क्र.ओ-१०, मुख्य लेखाशिर्ष ५४५२,पर्यटनावरील भांडवली खर्च,(०१) पर्यटनासाठी पायाभूत सुविधा, १०१, पर्यटन केंद्रे, (००) (००) (०२) ताजबाग विकास आराखडा जि.नागपूर (५४५२ ००७१) योजनांतर्गत" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

३. वर नमूद केलेल्या लेखाशिर्षांतर्गत झालेला प्रत्यक्ष खर्च व महालेखापाल कार्यालयाने नोंदविलेल्या खर्चाचा दरमहा ताळमेळ घालण्यात यावा. वितरीत केलेल्या निधीचे उपयोगीता प्रमाणपत्र शासनास तात्काळ सादर करावे.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या परिपत्रक क्र.अंदाज-२०१४/प्र.क्र.११०/२०१३/अर्थ-३, दि.१.७.२०१४ अनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१११०१२३१००४७१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ravindra Raghunath Gadhari

Digitally signed by Ravindra Raghunath Gadhari
DN: c=IN, o=government of maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Ravindra Raghunath Gadhari
Date: 2014.11.10 12:44:54 +05'30'

र.र.गढरी

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा),महाराष्ट्र-१,मुंबई
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा),महाराष्ट्र-२,नागपूर
३) वित्त विभाग (व्यय-८)/(अर्थ-१६) मंत्रालय,मुंबई.
४) विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर.
५) जिल्हाधिकारी,नागपूर.
६) सभापती,नागपूर सुधार प्रन्यास, नागपूर
७) आयुक्त, महानगरपालिका,नागपूर.
८) अधिक्षक अभियंता,महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नागपूर
९) जिल्हा नियोजन अधिकारी, नागपूर
१०) जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर
११) नियोजन विभाग, का.१४२४, मंत्रालय, मुंबई
१२) निवड नस्ती,नियोजन विभाग,का.१४४३, मंत्रालय,मुंबई